**वर्ष २०१५-१६ ते २०१७-१८ या तीन वर्षात राज्यामध्ये १०० कोटी वृक्ष लागवडीचा कार्यक्रम राबविण्यासंदर्भात कृती आराखडा तयार करणेबाबत .**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
शासन निर्णय क्र.एफडीएम-२०१५/प्र.क्र.२०९/फ-२
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ४ ऑगस्ट, २०१५

**संदर्भ :-** महाराष्ट्र शासन, महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.एफडीएम-२०११/ प्र.क्र.१०४/फ-२, दिनांक २५ ऑक्टोबर, २०११.

**प्रस्तावना :-**

जागतिक तापमानातील वाढ (Global Warming) आणि हवामानातील बदल (Climatic Change) याबाबत जागतिक स्तरावर मोठ्या प्रमाणात विचारमंथन सुरु झाले आहे. महाराष्ट्रात वनाच्छादन भौगोलिक क्षेत्राच्या २० टक्केच्या जवळपास आहे. पर्यावरण संतुलन आणि समतोल राखणे आणि टिकविण्यासाठी हे प्रमाण कमीत कमी ३३ टक्के पर्यंत असणे गरजेचे आहे. त्यासाठी राज्यामध्ये मोठ्या प्रमाणात वृक्ष लागवड करुन त्यातून हरित महाराष्ट्राची संकल्पना प्रत्यक्षात आणणे अत्यंत आवश्यक आहे. त्याचबरोबर ग्रामीण आणि शहरी भागातील वायु, ध्वनी आणि जल प्रदूषणाची तीव्रता कमी करण्यासाठी उपलब्ध जागांवर वृक्ष लागवड आणि उद्यानांची निर्मिती करुन जैवविविधतेचे (Bio-Diversity) संवर्धन करणे गरजेचे आहे.

शासनाने वर्ष २०१२-१३ पासून ५ वर्षाकरीता (सन २०१२-१३ ते २०१६-१७) ५०० कोटी वृक्ष लागवड करण्याबाबत संदर्भाधीन दि. २५ ऑक्टोबर, २०११ रोजीच्या शासन निर्णयाद्वारे धोरण निश्चित केले आहे. त्याच धर्तीवर वृक्ष लागवडीचा कार्यक्रम अधिक व्यापकरित्या राबविण्यासाठी आणि राज्यातील वनक्षेत्र आणि वृक्षाच्छादन वाढविण्यासाठी तातडीने पाऊले उचलणे आवश्यक आहे. त्यानुसार दि. ३० जुलै २०१५ रोजीच्या मंत्रीमंडळ बैठकीत येत्या ३ वर्षासाठी (सन २०१५-१६, २०१६-१७ आणि २०१७-१८) राज्यामध्ये किमान १०० कोटी वृक्ष लागवड करण्याचा विचार होण्याच्या दृष्टीने वन विभागाने नियोजन आराखडा व कृती कार्यक्रम तयार करण्याबाबत कार्यवाही करण्याचे निर्देश मा. मंत्रीमंडळाने दिले. त्यानुसार प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

मा. मंत्रीमंडळाच्या उपरोक्त निर्देशानुसार पुढील तीन वर्षाच्या कालावधीत १०० कोटी वृक्ष लागवडीचे उद्दिष्ट पूर्ण करण्याच्या दृष्टीने प्रथमत: नियोजन आराखडा व कृती कार्यक्रम तयार करण्याकरीता प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे :-

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर - अध्यक्ष
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र वन विकास महामंडळ, नागपूर - सदस्य
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक व महासंचालक, सामाजिक वनीकरण, पुणे - सदस्य
४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर - सदस्य

५) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांना योग्य वाटतील असे मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक) आणि उपमहासंचालक व मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण मधील प्रत्येकी २ असे एकूण ४ अधिकारी - सदस्य

६) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (मुल्यांकन व संनियंत्रण), सामाजिक वनीकरण - सदस्य सचिव

समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील :-

(१) सध्या अस्तित्वात असलेल्या शत कोटी वृक्ष लागवड कार्यक्रमाचा आढावा घेऊन त्या अंतर्गत येणाऱ्या अडचणी/समस्या विचारात घेऊन नव्याने येत्या तीन वर्षात १०० कोटी वृक्ष लागवडीचा कार्यक्रम वर्षनिहाय ठरविण्याबाबत उद्दिष्ट्ये, साध्य आणि जिवंत रोपांची टक्केवारी जास्तीत जास्त ८० ते ९० टक्केपर्यंत राहण्यासाठी आवश्यक संरक्षणविषयक सामग्री, पाणीपुरवठा आणि इतर उपाययोजना.

(२) स्थानिक भौगोलिक परिस्थिती, हवामान, पावसाचे प्रमाण, मातीचा स्तर आणि पाण्याची उपलब्धता याचा विचार करुन नियोजित वृक्ष लागवडीसंदर्भात निकोप, उत्कृष्ट, दर्जेदार आणि आवश्यक त्या उंचीच्या रोपांची पुरेशी उपलब्धता होण्यासाठी नियोजन.

(३) नियोजित वृक्षलागवडीमध्ये वर नमूद क्रमांक २ येथे नमूद परिस्थिती लक्षात घेवून, सावली देणारे पारंपारिक प्रजातीचे वृक्ष उदा. वड, पिंपळ, कडूनिंब, सिसव इत्यांदींची लागवड करणे त्याचबरोबर, फळफळावळ आणि शोभिवंत वृक्षांपैकी कोणत्या प्रजातिच्या वृक्षांची लागवड स्थानिक परिस्थितीनुसार करावी याबाबत समिती शिफारसी करेल.

(४) सदर योजना वन, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य वन विकास महांमडळ, कृषी, वन, जलसंधारण, शालेय शिक्षण, उच्च व तंत्रशिक्षण, आदिवासी, ग्रामविकास, उद्योग, जलसंपदा, सार्वजनिक बांधकाम, वैद्यकिय शिक्षण इत्यादी विभागांना सामावून घेऊन राबविण्याबाबत नियोजन.

(५) योजनेच्या अंमलबजावणीसाठी येणारा एकंदर आर्थिक भार आणि त्यासाठी निधीच्या उपलब्धतेसाठी वेगवेगळया स्त्रोतांची निश्चिती करणे.

(६) सदर योजना अस्तित्वातील कोणते कार्यक्रम/उपक्रम यामधून घ्यावेत, याबाबत शिफारशी.

(७) तसेच खाजगी उद्योजक, शिक्षण, सहकारी व स्वयंसेवी संस्था यांच्या सहाय्याने हा कार्यक्रम संयुक्तपणे राबविण्याबाबत असेलला वाव.

(८) लोक सहभागातून योजना राबविण्यासंदर्भात असलेली व्याप्ती/वाव.

(९) वन/सामाजिक वनीकरण विभागा व्यतिरिक्त इतर विभाग तसेच खाजगी क्षेत्रात रोपवाटिका निर्माण करणे. तसेच वृक्ष लागवड करण्यासाठी वन/सामाजिक वनीकरण विभागाकडून संबंधितांना आवश्यक तो तांत्रिक व प्रशासकीय सल्ला देणेसंदर्भात कार्यवाही.

(१०) वृक्ष लागवडीसाठी वन/वनेत्तर, खाजगी/सार्वजनिक/पडीक आणि पडीक जमीन विकास कार्यक्रम व ॲग्रोफॉरेस्ट्री इत्यांदी बाबीं अंतर्गत विविध ठिकाणांच्या जागांची उपलब्धता.

(११) वन/सामाजिक वनीकरण विभागामार्फत सन २०१५-१६ मध्ये वनक्षेत्र आणि वृक्षाच्छादन वाढविण्यासाठी मा.मंत्री (वने) यांनी अर्थसंकल्पात घोषीत केलेल्या योजना व नियोजित वृक्ष लागवडीचा कार्यक्रम यांची एकात्मिकरित्या (Integrated) अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने शिफारशी .

(१२) सदर कार्यक्रमांची अमलबजावणी उत्कृष्ठरित्या होण्यासाठी आणि लागवड केलेल्या वृक्षांचे संरक्षण, पाणी पुरवठा, कायमस्वरुपी देखभाल, निगा, जोपासणा आणि संगोपन इत्यांदी कामांचे सनियंत्रण, आढावा व देखरेख यासाठी राज्य, विभाग, जिल्हा, तालुका, गाव आणि शहर स्तरावर कोणत्या समित्या असाव्यात, त्यांची रचना आणि कर्तव्य आणि जबाबदाऱ्या याबाबत देखील समिती शिफारसी करेल.

सदर समितीने आपला अहवाल दिनांक ३१ ऑगस्ट, २०१५ पूर्वी शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८०४१२३९३५७११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

Dattatraye Laxman Thorat

Digitally signed by Dattatraye Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Dattatraye Laxman Thorat
Date: 2015.08.04 14:06:50 +05'30'

**(डी.एल. थोरात)**
**सह सचिव (वने)**

**प्रतिलिपी :-**

१) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
२) मा. मुख्य मंत्र्यांचे प्रधान सचिव
३) सर्व अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव/सचिव
४) अपर मुख्य सचिव (सार्वजनिक बांधकाम विभाग) / अपर मुख्य सचिव (कृषी) / प्रधान सचिव (महसूल)/ प्रधान सचिव (जलसंपदा)/ प्रधान सचिव (उद्योग) / प्रधान सचिव (उच्च व तंत्रशिक्षण) / अपर मुख्य सचिव (वैद्यकिय शिक्षण ) /प्रधान सचिव (ग्रामविकास) / सचिव (शालेय शिक्षण) / सचिव (आदिवासी विकास) / सचिव (जलसंधारण)
५) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
६) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र वन विकास महामंडळ मर्यादित, नागपूर
७) प्रधान मुख्य वनसंरक्षक व महासंचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे
८) सर्व प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर
९) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (मुल्यांकन व संनियंत्रण), सामाजिक वनीकरण संचालनालय, पुणे.
१०) सर्व अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर
११) सर्व मुख्य वनसंरक्षक/वनसंरक्षक/उपवनसंरक्षक
१२) सर्व मुख्य वनसंरक्षक व उपमहासंचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य.
१३) सर्व उपसंचालक, सामाजिक वनीकरण विभाग, महाराष्ट्र राज्य.
१४) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
१५) सर्व विभागीय आयुक्त
१६) सर्व जिल्हाधिकारी

१७) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१८) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१९) सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
२०) सर्व प्रकल्प अधिकारी, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा
२१) सर्व जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी,
२२) सर्व कृषी विकास अधिकारी, जिल्हा परिषद
२३) सर्व जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी,
२४) सर्व जिल्हा आदिवासी कल्याण अधिकारी,
२५) सर्व जिल्हा उद्योग अधिकारी
२६) सर्व कार्यासन, महसूल व वन विभाग (वनकक्ष)
२७) निवडनस्ती, फ-२ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई.